**श्री.रविंद्र पा. मेहत्रास व इतर ४ माजी जिल्हामंच अध्यक्षांना माजी न्यायमूर्ती श्री.जे.पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार वेतन व वेतनाच्या फरकाची रक्कम अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. न्यायप्र-२०१८/प्र.क्र.१७/ग्रासं-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (वि.), मुंबई-३२.
दिनांक:- २० जून, २०१८

वाचा:- १) महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २०००, च्या तरतूदीनुसार.
२) मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र.१२१३/२०१७ प्रकरणी मा.न्यायालयाचे दि.३१.०१.२०१८ चे आदेश.
३) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. राज्य/महा/आस्था -३/२०१८/१७५३, दि.०५.०४.२०१८.

प्रस्तावना :-

सर्वश्री रविंद्र पां. मेहत्रास, चंद्रकांत बी. पांढरपट्टे, अनिल य. गोडसे, प्रमोद बी. भट्ट व श्री.महेंद्र गोस्वामी, माजी जिल्हा मंच अध्यक्ष यांनी माजी न्यायमूर्ती श्री.जे.पद्मनाभान आयोगाच्या शिफारशीनुसार वेतन व वेतनाच्या फरकाची रक्कम अदा करण्याची मागणी रिट याचिका क्र.१२१३/२०१७ अन्वये मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे केली आहे. सदर याचिकेची सुनावणी दि.२१.०१.२०१८ रोजी झालेल्या सुनावणीत वरील ५ व इतर आजी / माजी जिल्हा मंच अध्यक्षांना वरील आयोगाच्या शिफारशीनुसार वेतन व वेतनातील फरकाची रक्कम अदा करण्याबाबत निर्णय घ्यावा, असे आदेश मा.न्यायालयाने संदर्भ क्र.२ अन्वये दिले आहेत. त्यानुसार वरील ५ माजी जिल्हा मंच अध्यक्षांना उपरोक्त आयोगाच्या शिफारशीनुसार वेतन व वेतनाच्या फरकाची रक्कम अदा करण्याच्या दृष्टीने राज्य आयोगाकडून अहवाल मागविण्यात आला होता. त्यानुसार माजी न्यायमूर्ती जे.पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार वरील ५ जिल्हा मंच अध्यक्षांना वेतन व वेतनाच्या फरकाची रक्कम अशी एकूण रु.२५,४६,६९७/- इतकी रक्कम अदा करण्याबाबत राज्य आयोगाने संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

२. सर्वश्री रविंद्र पां. मेहत्रास, चंद्रकांत बी. पांढरपट्टे, अनिल य. गोडसे, प्रमोद बी. भट्ट व श्री.महेंद्र गोस्वामी, माजी जिल्हा मंच अध्यक्ष यांनी माजी न्यायमूर्ती श्री.जे.पद्मनाभान आयोगाच्या शिफारशीनुसार वेतन

व वेतनाच्या फरकाची रक्कम अदा करण्याची मागणी रिट याचिका क्र.१२१३/२०१७ अन्वये मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे केली आहे. सदर याचिकेची सुनावणी दि.२१.०१.२०१८ रोजी झालेल्या सुनावणीत वरील ५ व इतर आजी / माजी जिल्हा मंच अध्यक्षांना वरील आयोगाच्या शिफारशीनुसार वेतन व वेतनातील फरकाची रक्कम अदा करण्याबाबत निर्णय घ्यावा, असे आदेश मा.न्यायालयाने संदर्भ क्र.२ अन्वये दिले आहेत. महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० मधील नियम ३(१) अन्वये जिल्हा मंच अध्यक्षांना जिल्हा न्यायाधिशाच्या वेतनश्रेणीतील किमान टप्प्यावरील वेतन देय होईल, अशी तरतूद आहे. सदर नियमाच्या तरतूदीनुसार जिल्हा मंच अध्यक्षांची नियुक्ती पूर्णकालिक तत्वावर झाली असल्यास राज्य न्याय सेवेतील जिल्हा न्यायधीशांच्या वेतनश्रेणीतील किमान टप्प्यावरील वेतन अनुज्ञेय आहे. सहाव्या वेतन आयोगात जिल्हा न्यायधीशाच्या वेतनात वाढ झाल्यानुसार सुधारीत वेतन प्रदान करण्याची वरील याचिकाकर्त्यांची मागणी मा.उच्च न्यायालयाने वरील रिट याचिकेत मान्य केली आहे. त्यानुसार माजी न्यायमूर्ती श्री. जे.पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार राज्य न्याय सेवेतील जिल्हा न्यायधीशांना सुधारीत केलेल्या वेतनश्रेणीतील किमान टप्प्यावरील वेतन रु.५१,५५०/- तसेच, अनुज्ञेय असलेल्या वेतनातील फरकाची रक्कम रु.२५,४६,६९७/- इतकी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. परंतु, सदरहु रक्कम अर्थसंकल्पीय तरतूदीच्या मर्यादेत खर्च करण्याच्या अटीच्या अधीन राहून वरील ५ माजी जिल्हा मंच अध्यक्षांना (याचिकाकर्त्यांना) अदा करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च, मागणी क्र.एम-२ “२४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०४) (००) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य ग्राहक संरक्षण परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंचाची स्थापना करणे (०४) (०१) मुंबई शहर (२४०८ ०२५१) ०१” आणि मुफसल (अनिवार्य), २४०८०२६२, ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८५/अर्थ १६, दि.२७.०४.२०१८ अन्वये प्राप्त संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८०६२११७११२०७६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Raju Kalluji Narpande

Digitally signed by Raju Kalluji Narpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c9bb69da44e8b03c93d1a880163547bbb4787f2f2839b6277a288182cbf623cb, cn=Raju Kalluji Narpande
Date: 2018.06.21 17:10:18 +05'30'

**( राजू क. नरपांडे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३) मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
५) अ.मु.स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, (विधी व न्याय), मंत्रालय, मुंबई
७) अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
८) प्रधान सचिव, (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.
९) उप सचिव, ग्रा.सं.४ (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.)
१०) वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
११) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर
१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (द्वारा वित्तीय सल्लागार व उपसचिव)
१५) सर्वश्री रविंद्र पां. मेहत्रास, चंद्रकांत बी. पांढरपट्टे, अनिल य. गोडसे, प्रमोद बी. भट्ट व श्री.महेंद्र गोस्वामी, माजी जिल्हा मंच अध्यक्ष (राज्य आयोगा मार्फत).
१६) निवडनस्ती, ग्रासं-४.